# महाराष्ट्र शासन

**क्रमांक :** बदली-१०१०/प्र.क्र.१०३/१०/३४-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
**दिनांक :** ५ जुलै,२०१०.

## आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्याचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ अन्वये माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील गट-अ व गट-ब संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. (१) | अधिकाऱ्याचे नाव (२) | सध्याचे पद व ठिकाण (३) | बदलीचे पद व ठिकाण (४) |
|---|---|---|---|
| | | **गट-अ अधिकारी** | |
| १ | श्री.सुरेश वांदिले | मा. मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, [उपसंचालक (माहिती)] प्रतिनियुक्तीने मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई | मुख्यमंत्री सचिवालयातून प्रत्यावर्तीत करुन उपसंचालक (प्रकाशने), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई |
| २ | श्री.सतिश लळीत | उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर | प्रतिनियुक्तीने मा. मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई |
| ३ | श्री.वसंत शिर्के | उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, पुणे | उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर |
| ४ | श्री.रा.ए. सरग | जिल्हा माहिती अधिकारी, पुणे | जिल्हा माहिती अधिकारी, परभणी |
| ५ | श्रीमती व.चं. शेडगे | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) विभागीय संपर्क कक्ष, मंत्रालय, मुंबई | जिल्हा माहिती अधिकारी, पुणे |
| ६ | श्री.पु.द. पाटोदकर | जिल्हा माहिती अधिकारी, रत्नागिरी | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), विभागीय संपर्क कक्ष, मंत्रालय, मुंबई |
| | | **गट-ब अधिकारी** | |
| १ | श्रीमती वर्षा पाटोळे | माहिती अधिकारी, उप माहिती कार्यालय, डहाणू , जिल्हा- ठाणे | सहायक संचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर |

२. श्री.रा.ए.सरग, जिल्हा माहिती अधिकारी, पुणे यांची बदली या आदेशान्वये जिल्हा माहिती अधिकारी, परभणी येथे करण्यात येत असल्याने यापूर्वी शासन निर्णय क्र. माजम-२००९/११०९/प्र.क्र.४५६/०९/३४-अ, दि.४.२.२०१० अन्वये डॉ.सं.शि.खराट, वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) यांची जिल्हा माहिती अधिकारी, परभणी येथे करण्यात आलेली बदली या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.

३. श्री.वसंत शिर्के, उपसंचालक (माहिती), पुणे यांची बदली विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर येथे करण्यात येत असल्याने उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, पुणे या रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेश होईपर्यंत श्री.शिर्के, उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर यांच्याकडे सोपविण्यात येत आहे.

४. श्री. सुरेश वांदिले, मा. मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी यांच्या प्रत्यावर्तनाचे व श्री.सतिश लळीत यांची मा. मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी म्हणून प्रतिनियुक्तीने पदस्थापनेचे रितसर आदेश सामान्य प्रशासन विभाग/का.२१, मंत्रालय, मुंबई- ३२ यांच्या कडून निर्गमित करण्यात येतील.

५. वरील अधिकाऱ्यांना बदलीच्या/प्रत्यावर्तनाच्या/प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होण्यासाठी **तत्काळ** कार्यमुक्त करण्यात यावे. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या पदावर तत्काळ रुजू होऊन आवश्यक अहवाल सर्व संबंधीत कार्यालयांस तसेच शासनास विनाविलंब सादर करावा. हे आदेश तत्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांची बदलीनंतरच्या पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही व त्या संदर्भात कोणत्याही प्रकारे दबाव आणल्यास संबंधीत अधिकाऱ्यांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ अन्वये शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

६. हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००७०५२०००४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(निं. बा. रायलापूरकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
मा. राज्यमंत्री (मावज) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा व परिक्षा), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा व परिक्षा), नागपूर,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती)(वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती), नागपूर -अमरावती विभाग, नागपूर,
संचालक (माहिती), औरंगाबाद विभाग, औरंगाबाद,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सर्व विभागीय उपसंचालक (माहिती)/जिल्हा माहिती अधिकारी,
संबंधीत अधिकारी, (मावज मार्फत),
सामान्य प्रशासन विभाग/का.१२, २१ व ३४,
**निवड नस्ती (का.३४-अ).**